राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा सन २०२१-२२ करिता राज्यस्तरावरील विजेत्यांना पारितोषिक वितरण करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रागांअ-११२१/प्र.क्र.४७/१८ अ,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १८ एप्रिल, २०२२.

**वाचा:-** १) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, रागांअ ११२१/प्र.क्र.३/१८ अ, दि.३.२.२०२१.

२) शासन निर्णय क्रमांक सामान्य प्रशासन विभाग, रागांअ ११२१/प्र.क्र.४७ (भाग २)/ १८ अ दि. २१ मार्च, २०२२.

**प्रस्तावना :**

प्रशासनातील सेवांच्या गुणवत्तेमधील वाढ (Service quality improvement), लोकाभिमुखता (Citizen Centricity) व निर्णयक्षमता आणण्याकरिता तसेच सर्वांच्या सहकार्यातून उत्तम प्रशासन कार्यान्वीत करण्याकरिता "राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा" ही योजना शासन निर्णय दि.३.२.२०२१ अन्वये राबविण्यात येत आहे. या अभियानातंर्गत सहभाग घेऊन स्पर्धेत सर्वोत्तम कामगिरी केलेली कार्यालये व सर्वोकृष्ट कल्पना/उपक्रम सुचविणाऱ्या शासकीय संस्था, अधिकारी व कर्मचारी यांना पारितोषिके वितरीत करण्यात येणार आहेत. राज्य स्तरावर प्रशासकीय गतिमानता अंतर्गत चार वर्गवारीत प्रत्येकी प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकांसाठी अनुक्रमे रु. १०.०० लाख, रु. ६.०० लाख व रु. ४.०० लाख इतक्या रकमेची एकूण १२ पारितोषिके वितरीत करण्यात येणार आहेत. तसेच सर्वोत्कृष्ट कल्पना/ उपक्रम सुचविणाऱ्या शासकीय संस्था, अधिकारी व कर्मचारी यांना अनुक्रमे प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकांसाठी अनुक्रमे रु.५० हजार, रु. ३० हजार व रु. २० हजार इतक्या रकमेची तीन वर्गवारीत एकूण ९ पारितोषिके वितरीत करण्यात येणार आहेत.

२. सन २०२१-२२ या वर्षापासून राज्यात तालुका, जिल्हा, विभाग व राज्यस्तरावर "राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा" चे आयोजन करण्यात आले असून या अभियानाच्या अनुषंगाने स्पर्धेचे प्रस्ताव सादर करणेसाठी पंतप्रधान पारितोषिक योजनेच्या धर्तीवर ऑनलाईन पोर्टल विकसित करण्यात आले आहे. स्पर्धेसाठी सर्व स्तरावरुन ऑनलाईन प्रस्ताव प्राप्त झाले आहेत. तालुका, जिल्हा, विभाग स्तरावरील प्रस्तावांची छाननी पूर्ण झाली असून या स्तरावरील पारितोषिके वितरीत करण्यासाठी त्या त्या स्तरावर कार्यक्रमांचे आयोजन करण्यात येणार आहे. या अभियानातंर्गत राज्यस्तरावर प्राप्त प्रस्तावांची छाननी राज्यस्तरीय निवड समिती मार्फत करण्यात आली असून सन २०२१-२०२२ करिता अंतिम पारितोषिक विजेत्यांची निवड करण्यात आली आहे.

**३.** संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णय दि. २१ मार्च, २०२२ अन्वये सन २०२१-२२ करिता राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा अंतर्गत विजेत्यांना वितरीत करावयाच्या पारितोषिक रकमेच्या खर्चास मान्यता देण्यात आली आहे. उक्त पाश्र्वभूमीवर राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा अंतर्गत सन २०२१-२२ या वर्षाकरिता राज्यस्तरावरील विजेत्यांना पारितोषिक वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२१-२२ या वर्षाकरिता "राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा" या अभियानातंर्गत राज्यस्तरावर प्राप्त प्रस्तावांपैकी राज्यस्तरीय स्पर्धेत प्रशासकीय गतिमानता व सर्वोकृष्ट कल्पना या वर्गवारीत राज्यस्तरीय निवड समितीमार्फत पात्र व अंतिम विजेते ठरविण्यात आलेल्या स्पर्धकांना

खालीलप्रमाणे त्यांच्या नावासमोर दर्शविलेली पारितोषिके वितरित करण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे:-

I. **प्रशासकीय गतिमानता अंतर्गत:**

**अ) मंत्रालयीन प्रशासकीय विभागांकडून येणारे प्रस्ताव :-**

मंत्रालयीन प्रशासकीय विभाग स्तरावर सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग या एकाच विभागाचा प्रस्ताव असल्याने त्या विभागास स्पर्धेत भाग घेतल्याचे उत्तेजनार्थ प्रमाणपत्र व सन्मानचिन्ह देण्यात येत आहे.

**ब) राज्यातील सर्व मुख्यालयाच्या कार्यालयातून थेट येणारे प्रस्ताव :-**

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव व उपक्रम | क्रमांक | पारितोषिकाचे स्वरुप |
|---|---|---|---|
| १ | मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी, मुंबई.<br>**उपक्रम-** महाराष्ट्र स्टार्ट अप सप्ताह, २०२०. | प्रथम | रोख रु. १०,००,०००/-<br>(रु. दहा लाख फक्त ),<br>सन्मानचिन्ह व प्रशस्तीपत्रक. |
| २ | प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषी संजीवनी प्रकल्प (PoCRA), मुंबई.<br>**उपक्रम-** Direct Benefit Transfer Process at PoCRA. | द्वितीय | रोख रु. ६,००,०००/-<br>(रु.सहा लाख फक्त),<br>सन्मानचिन्ह व प्रशस्तीपत्रक. |
| ३ | विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, नाशिक.<br>**उपक्रम-** कार्यालयीन व्यवस्थापनामध्ये आधुनिक संकल्पना व व्यवस्थापन पध्दतींचा अवलंब करणे, आत्महत्याग्रस्त शेतकरी कुटुंबांच्या मदतीकरिता उभारी कार्यक्रम, पर्यावरण पूरक सौरऊर्जा प्रणाली बसवून ऊर्जेची बचत, वॉटर हार्वेस्टींगचा वापर, कार्यालयास ग्रीन बिल्डिंग प्रमाणपत्र, मोफत ७/१२ वाटप. | तृतीय | रोख रु. ४,००,०००/-<br>(रु.चार लाख फक्त),<br>सन्मानचिन्ह व प्रशस्तीपत्रक. |

**क) विभागीय स्तरांवरील निवड समित्यांकडून प्राप्त होणारे प्रस्ताव:-**

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | क्रमांक | पारितोषिक |
|---|---|---|---|
| १ | पोलीस अधीक्षक कार्यालय, अहमदनगर.<br>**उपक्रम** - जिल्हयातील पोलिस ठाणे पासून पोलिस अधीक्षक कार्यालयांमध्ये दैनंदिन टपालाचे वितरण करण्यासाठी ई-टपाल प्रणाली विकसित करणे. | प्रथम | रोख रु.१०,००,०००/-<br>(रु.दहा लाख फक्त),<br>सन्मानचिन्ह व प्रशस्तीपत्रक. |
| २ | उपविभागीय अधिकारी कार्यालय, यवतमाळ.<br>**उपक्रम-** सुसज्ज व निटनेटकी कार्यालयीन रचना. | व्दितीय | रोख रु.६,००,०००/-<br>(रु.सहा लाख फक्त),<br>सन्मानचिन्ह व प्रशस्तीपत्रक. |
| ३ | पंचायत समिती, राहता, अहमदनगर.<br>**उपक्रम-** नागरीकांच्या स्थानिक पातळीवरील समस्यांचे थेट निराकरण, कोरोना कालावधीत मदत, बचत गट विक्री व प्रदर्शन कार्यक्रम, घरकुल प्रकल्प सक्षमपणे राबविणे. | तृतीय | रोख रु.४,००,०००/-<br>(रु. चार लाख फक्त),<br>सन्मानचिन्ह व प्रशस्तीपत्रक. |

**ड) महानगरपालिका :-**

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | क्रमांक | पारितोषिक |
|---|---|---|---|
| १ | आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका.<br>**उपक्रम-** कार्यालयीन व्यवस्थापनामध्ये आधुनिक संकल्पना व कार्यपध्दतींचा अंगीकार करणे, ई-गव्हर्नन्स, लोकाभिमुख कार्यालय. | प्रथम | रोख रु.१०,००,०००/-<br>(रु.दहा लाख फक्त),<br>सन्मानचिन्ह व प्रशस्तीपत्रक. |
| २ | आयुक्त, नागपूर महानगरपालिका.<br>**उपक्रम-** "टॅक्स मॉनिटरींग ॲप" विकसित करुन महानगरपालिकेच्या कर संकलनामध्ये गतिशिलता आणणे व मालमत्ता निहाय सर्व अचूक माहिती त्वरित उपलब्ध होणे. | व्दितीय | रोख रु.६,००,०००/-<br>(रु.सहा लाख फक्त),<br>सन्मानचिन्ह व प्रशस्तीपत्रक. |
| ३ | आयुक्त, मिरा भाईंदर महानगरपालिका.<br>**उपक्रम-** सेवा हमी कायदयाअंतर्गत ४८ विविध प्रकारच्या सेवा नागरीकांना ऑनलाईन उपलब्ध करुन देणे. | तृतीय | रोख रु.४,००,०००/-<br>(रु. चार लाख फक्त),<br>सन्मानचिन्ह व प्रशस्तीपत्रक. |

II. <u>सर्वोकृष्ट कल्पना अंतर्गत:-</u>

**अ) शासकीय संस्था:-**

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | क्रमांक | पारितोषिक |
|---|---|---|---|
| १ | तहसिल कार्यालय, तळोदा, नंदुरबार.<br>**उपक्रम-** उपलब्ध जागेचा पर्याप्त व सुनियोजितपणे वापर करुन तहसिल कार्यालयात वाहनतळ तयार करुन पार्किंगसाठी शिस्त लावणे. | प्रथम | रोख रु.५०,०००/-<br>(रु.पन्नास हजार फक्त),<br>सन्मानचिन्ह व प्रशस्तीपत्रक. |
| २ | तहसिल कार्यालय, नवापूर, नंदुरबार.<br>**उपक्रम-** अभिलेख कक्षाचे नूतनीकरण करणे. | व्दितीय | रोख रु.३०,०००/-<br>(रु.तीस हजार फक्त),<br>सन्मानचिन्ह व प्रशस्तीपत्रक. |
| ३ | जिल्हाधिकारी, अकोला.<br>**उपक्रम-** व्हिडिओ टेलिग्राफी आणि व्हिडिओ कॉन्फरन्सिंग या तंत्रज्ञानाचा वापर करुन गावस्तरावरुन जिल्हास्तरापर्यंत नागरिकांशी थेट संपर्क साधण्याकरिता "डिजीटल राहोटी" हे नाविन्यपूर्ण अभियान राबवून नागरिकांच्या समस्या सोडविणे. | तृतीय | रोख रु.२०,०००/-<br>(रु.वीस हजार फक्त),<br>सन्मानचिन्ह व प्रशस्तीपत्रक. |

**ब) शासकीय अधिकारी :-**

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | क्रमांक | पारितोषिक |
|---|---|---|---|
| १ | डॉ. राजेंद्र बी. भोसले, जिल्हाधिकारी, अहमदनगर.<br>**उपक्रम-** शेतकरी व नागरीकांचे दैनंदिन प्रश्न त्वरित निकाली काढण्याकरिता जिल्हयात " महसूल विजय सप्तपदी" अभियान राबविणे. | प्रथम | रोख रु.५०,०००/-<br>(रु.पन्नास हजार फक्त),<br>सन्मानचिन्ह व प्रशस्तीपत्रक. |

| | | | |
|---|---|---|---|
| २ | श्री.अभिजीत राऊत, जिल्हाधिकारी, जळगाव.<br>**उपक्रम-** ७/१२ उताऱ्यातील प्रदीर्घ कालावधीपासून प्रलंबित कालबाहय फेरफार नोंदी वगळण्याची धडक मोहिम राबवून अद्ययावत अभिलेख तयार करणे. | व्दितीय | रोख रु.३०,०००/-<br>(रु.तीस हजार फक्त),<br>सन्मानचिन्ह व प्रशस्तीपत्रक. |
| ३ | श्री. एकनाथ बिजवे, नायब तहसिलदार, उपविभागीय अधिकारी कार्यालय, यवतमाळ.<br>**उपक्रम-** उपविभागीय कार्यालय अंतर्गत आझाद मैदान व समता मैदान भाडेतत्वावर देण्याकरिता ऑनलाईन व पारदर्शी कार्यपध्दती विकसित करणे, सर्व कर्मचारी यांचेकरिता प्रशिक्षण वर्ग सुरु करणे. | तृतीय | रोख रु.२०,०००/-<br>(रु.वीस हजार फक्त),<br>सन्मानचिन्ह व प्रशस्तीपत्रक. |

**क) शासकीय कर्मचारी:-**

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | क्रमांक | पारितोषिक |
|---|---|---|---|
| १ | श्री. अजय राजाराम लोखंडे, कर निर्धारण व प्रशासकीय अधिकारी, भडगाव नगरपरिषद, भडगाव, जळगाव.<br>**उपक्रम-** न्यायालयीन निर्णय तसेच नगरपरिषदे मार्फत आकारल्या जाणाऱ्या करांबाबत सोप्या भाषेत व व्यंगचित्राच्या माध्यमातून फोटोफ्रेमद्वारे नागरिकांमध्ये जनजागृती करणे. | प्रथम | रोख रु.५०,०००/-<br>(रु.पन्नास हजार फक्त),<br>सन्मानचिन्ह व प्रशस्तीपत्रक. |
| २ | श्री. निशीकांत सुर्यकांत पाटील, तलाठी, पारोळा शहर, तलाठी कार्यालय पारोळा,जळगाव.<br>**उपक्रम-** स्वखर्चाने व लोकसहभागातून तलाठी कार्यालय नूतनीकरण व सुसज्ज करणे. | व्दितीय | रोख रु.३०,०००/-<br>(रु.तीस हजार फक्त),<br>सन्मानचिन्ह व प्रशस्तीपत्रक. |

२. उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे पारितोषिकांसाठी एकूण रोख रु.६२,८०,०००/-(रुपये बासष्ट लाख ऐंशी हजार फक्त) इतकी रक्कम संदर्भ क्र. २ येथील दि. २१ मार्च,२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार संबधित कार्यालयांना धनादेशाव्दारे उपलब्ध करून देण्यास मंजूरी देण्यात येत आहे. कक्ष अधिकारी, रोख शाखा (कार्यासन २६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी उपरोक्त सर्व कार्यालयांचे धनादेश तयार करुन या कार्यासनास उपलब्ध करुन दयावेत.

३. या अभियानातंर्गत विजेत्यांनी प्राप्त पारितोषिकाच्या रकमेचा वापर कार्यालयीन सुधारणेसाठीच करावयाचा आहे. महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिकेमधील नमुना क्रमांक १० मध्ये खर्चाचा तपशील ठेवण्यात यावा. खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित नमुन्यात, खर्चाची कारणे व साक्षांकित देयकांच्या प्रतीसह धनादेश मिळाल्यापासून एक महिन्याच्या आत अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग /कार्यासन २६ व कार्यासन १८-अ, मंत्रालय मुंबई -३२ यांना सादर करण्याबाबत दक्षता घ्यावी.

४. या अभियानातंर्गत पारितोषिक प्राप्त प्रस्तावांचे/उपक्रमांचे अनुकरण अन्य विभागात/कार्यालयात करण्यासाठी प्रस्तावांचे/उपक्रमांचे दस्तऐवजीकरण (documentation) यशदा, पुणे यांच्यामार्फत करण्यात येईल. यशदा, पुणे यांनी उपरोक्त पारितोषिक प्राप्त प्रस्तावांचे/उपक्रमांचे अनुकरण राज्यातील विभागात/ कार्यालयात करण्याच्या दृष्टीने एक कार्यपध्दती सुनिश्चित करावी. यासंदर्भात केलेल्या कार्यवाहीचा अहवाल मा.मुख्य सचिव महोदयांना सादर करावा. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी त्यांच्या विभागाअंतर्गत राबविण्यात आलेल्या पारितोषिक प्राप्त प्रकल्पांची त्यांच्या स्तरावर दखल घेऊन त्याची अंमलबजावणी विभागाअंतर्गत अन्य कार्यालयात करता येईल याद्दष्टीने आवश्यक कार्यवाही करावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०४१८१२५७५०२१०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SOMNATH NAMDEO BAGUL

Digitally signed by SOMNATH NAMDEO BAGUL
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b01714c1480a47cec5943a1c3c73ea95af0534418cf92d1ac844331c4116879d, serialNumber=4807c89831881ede55b0d82cb9991539d1bd33c6f8a64931d9194d5e2cbdcf56, cn=SOMNATH NAMDEO BAGUL
Date: 2022.04.18 13:03:49 +05'30'

**( सो. ना. बागुल )**
**सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग**

**प्रत,**

१) सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२) महासंचालक, यशदा, पुणे
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी, मुंबई.
४) प्रोजेक्ट डायरेक्टर, नानजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई.
५) विभागीय आयुक्त, नाशिक.
६) पोलीस अधीक्षक कार्यालय, अहमदनगर.
७) उपविभागीय अधिकारी कार्यालय, यवतमाळ.
८) पंचायत समिती, राहता, अहमदनगर.
९) आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका.
१०) आयुक्त, नागपूर महानगरपालिका.
११) आयुक्त, मिरा भाईंदर महानगरपालिका.
१२) तहसिल कार्यालय, तळोदा, नंदुरबार.
१३) तहसिल कार्यालय, नवापूर, नंदुरबार.
१४) जिल्हाधिकारी, अकोला.
१५) जिल्हाधिकारी, अहमदनगर.
१६) जिल्हाधिकारी, जळगाव.
१७) नायब तहसिलदार, उपविभागीय अधिकारी, यवतमाळ.
१८) कर निर्धारण व प्रशासकीय अधिकारी, भडगाव नगरपरिषद, भडगाव, जिल्हा जळगाव.
१९) तलाठी, पारोळा, जळगाव.
२०) अधिदान व लेखा अधिकारी (४ प्रती- रोख शाखेमार्फत).
२१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा)-महाराष्ट्र-१,मुंबई (प्रत्येकी २ प्रती),

२२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा)-महाराष्ट्र-२,नागपूर (प्रत्येकी २ प्रती),
२३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२४) जिल्हा कोषागार अधिकारी मुंबई /ठाणे/पुणे/नाशिक/नंदुरबार/जळगाव/ अहमदनगर/ नागपूर/ अकोला/यवतमाळ,
२५) वित्त विभाग/ व्यय-४,
२६) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग / का.क्र. २५ व २६
२७) निवड नस्ती, का. १८-अ.